# हरिहरगड

# लेखक: आदित्य गुरव

aaditya.gurav2014@gmail.com

छायाचित्रण - देवव्रत फळ.

नकाशा- trekshitiz.com



प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान®

esahity@gmail.com

www.esahity.com

Published : 30 January 2016

# हरिहर गड

(घोटी- वैतरणा, इगतपुरी- नाशिक)

लेखक -आदित्य गुरव.




**काठीण्य पातळी :** ३.५/५.०

**उंची :** ३६७६ फूट /११२० मी.

**प्रत्येकी खर्च :** ३०० रु. (मुंबई ते मुंबई)

**कालावधी :** १ दिवस - १ रात्र

**अर्पण:**

माझ्या प्रवासात

नेहमी माझ्या पाठीशी असणाऱ्या

माझ्या परिवाराला

आणि माझ्या सोबत असणाऱ्या माझ्या
मित्रपरिवाराला

सप्रेम अर्पण.

**नकाशा :**




**प्रारंभ :**

आमच्या ग्रुपमध्ये २ पूर्णवेळ आणि ५ होऊ घातलेले,असे मिळून एकूण ७ इंजिनियर्स होतो. रात्रीचा मुक्काम हा इगतपुरी एस. टी. डेपो असल्याने सुमारे १०° से. खालील थंडीशी सामना करण्यासाठी आम्ही स्वेटर,चादर,कानटोपी,मफलर इत्यादी शस्त्रे जवळ बाळगली होती. माझ्यासकट ग्रुपमधील अजून काही जणांसाठी हा पहिला ग्रुप ट्रेक होता. त्यामुळे देवव्रतची प्रत्येक सूचना पाळण्याशिवाय गत्यंतर नव्हते . माझा स्वतःचा बऱ्याच काळानंतरचा ट्रेक असल्याने बऱ्याचशा वायफळ गोष्टींनी माझी बॅग आधीच जड झाली होती .

डिसेंबरच्या शनिवारी आम्ही सगळेजण अगदी ठरल्या वेळेत  सी . एस . टी. स्टेशनला हजर झालो . लगबगीने सी . एस . टी . हून रात्री १२. ०० ला सुटणाऱ्या महानगरी एक्सप्रेसमध्ये आम्ही जागा मिळवली .आमचा मुंबई ते इगतपुरीचा ट्रेनचा प्रवास आम्ही नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे आमचे प्रोफेसर्स, एक्झामिनर्स , कॉलेज-युनिवर्सिटीतील "सोयी-सुविधा", आय.एम.एस. क्लासेस, मार्केटिंग स्ट्रेटजीसबाबतच्या चर्चासत्रात आणि अर्थातच एकमेकांचे "गुणगान" गाण्यास समर्पित केला.

अगदी नियोजित वेळेत म्हणजेच रात्री ३. १० वाजता आम्ही इगतपुरी स्टेशनला पोहोचलो. अगदी गाडीतून पाय बाहेर पडताच थंडीने आपली चाहूल दिली आणि ह्या थंडीशी सामना अजून रात्रभर करायचा होता. इगतपुरी डेपोमध्ये आमच्याशिवाय कुणीच नव्हतं. टीसेक तरुण आणि आभाष  अगदी गाढ झोपून गेले.(डोक्यावर कानटोपी अन अंगावर चादर, अगदी गावठी स्टाईलमध्ये !! ) मधल्या काळात मनोज आणि मी स्वतः




कुठूनतरी एक छोटंसं  पेटतं लाकूड मिळवलं आणि ते अलगद एस. टी. डेपोच्या आवारात आणलं. त्याची शेकोटी केली. आत्ता ही  शेकोटी जळती ठेवण्याची जबाबदारी स्वीकारत

मी वाटेवर दिसणाऱ्या सर्व राजकीय पक्षांची पोस्टर्स (दुसरी कोणतीच पोस्टर्स उपलब्ध नसल्याने) इंधन म्हणून वापरून घेतली.

पहाटे ५ च्या सुमारास एक -एक करत आम्ही सर्व मंडळी झोपी गेलो आणि मस्तपैकी एक-दीड तास झोप काढली. साकेक तरुणने रात्री गाडीत अगदी सणकून झोप घेतल्याने त्याला काही झोप येत नव्हती. थोड्या फार माकडचेष्टा केल्यावर त्याने आम्हा झोपलेल्या वीरांवर पहारा देण्याचे महत्वाचे कार्य पार पाडले.

सकाळी एक-एकजण जागे होऊन प्रातर्विधी उरकून समोरच उघडलेल्या चहाच्या टपरीवर पोहोचलो. थंडीची शाळा अजून सुरूच होती . नाश्ता आला . चहा आणि भज्या. बस्स! एक नंबर!!

**निरगुडपाडा (टाकेहर्ष) पर्यंत:**




सकाळी ८ ला एस.टी. आली. बसप्रवासात अतिशय प्रसन्न वातावरण , वळणावळणाच्या पायवाटा , वैतरणा तलावाचे सान्निध्य आपले स्वागत करते. बैलगाड्या , गवताच्या गंजी , छोटी-छोटी शेते ,बोअरवेल हयांची तुलना कोन्क्रीटच्या बिल्डींग्स आणि रोड्सशी होउच नये अशी.




दुसरीकडे इगतपुरीच्या टप्प्यातले इतरही अनेक गड-किल्ले-शिखरे आम्हाला दर्शन देत होती. अंजनेरी ,त्र्यंबकेश्वर, भासगड , त्रिंगलवाडी , फणी डोंगर ,अलंग-कुलंग-मदन अगदी नजर जाईल तिथवर आणि हो अर्थात हरिहर.

**ट्रेक:**

प्रवासात आम्हा सर्वांची ब्रह्मानंदी टाळी लागली होती, देवव्रत बिच्चारा जागाच असावा . इगतपुरीहून निघालेली एस. टी. निरगुडपाड्यास पोहोचण्यास साधारण २ तास लागले. त्र्यंबकेश्वराकडे जाताना वाटेत एक फाटा आपल्याला इथे घेऊन येतो. एस. टी. बस सकाळी १०.२५ ला निरगुड पाड्याला पोहोचली . आम्ही साधारण ५ मिनिटांतच स्वेटर- मफलर गुंडाळून, शू लेस घट्ट बांधून हरिहरचा रस्ता धरला . वाट

अगदीच  मळलेली नसली तरी सरधोपट आहे .




काहीसा आयताकृती हरिहर पायथ्यापासूनच आपले लक्ष वेधून घेतो.चढताना गड आपल्या नजरे पासून कधीच दूर होत नाही हे विशेष.  फणी डोंगराला डावीकडे ठेवत आम्ही हरीहरची चढण चढत होतो. फणी डोंगर त्याच्या नागाच्या फण्याप्रमाणे दिसणाऱ्या आकारामुळे ओळखला जातो, मला मात्र उगाच तो हत्तीच्या आकृतीशी साधर्म्य राखणारा वाटला.



वाट तशी मोकळी. जास्त झाडी-झुडुपे, घनदाट जंगल असले काही नाही. पठारावर पोहोचताच समोर शेंदूर फासलेली (पण का ?) पिंडीसदृश शिळा दिसली.



इथून अगदी थोड्या वेळातच आपण कातळाच्या(पायऱ्यांच्या) पायथ्याला पोहोचतो. पायऱ्या चढताना चढण नक्कीच जाणवते. पायऱ्या  चढून गेल्यावर गडाचा पहिला दरवाजा आपले स्वागत करतो.





दरवाजा पार करताच आपल्याला खडकात सुबकपणे कोरलेला गणपती (आणि पुन्हा शेंदूर) दिसतो.




दरवाजा मोठा नसला तरी त्यात उभे राहून पाहिलेली पाठीमागची दरी कधीही न विसरण्यासारखी!



इथे पोहोचताच "आत्ता उतरायचे कसे?" प्रकारातले भाव माझ्या तोंडावर होते. "ट्रेक सोप्पाय रे!" हे देवव्रतचं गाडीतलं वाक्य माझ्या डोक्यात पुन्हा चमकून गेलं.

पायऱ्या अतिशय लहान, खोदीव आणि अपुऱ्या. सुरुवातीला सोपी असणारी चढण पायऱ्यांच्या  उंचीसोबत कठीण होत जाते. काही ठिकाणी तर अगदी पुढे कातळ आणि मागे दरी अशी परिस्थिती आहे. अशावेळी घाई गडबड न करता आपला वेळ घेऊन ही

चढण पूर्ण करणे केव्हांही श्रेयस्कर . काही ठिकाणी तर पायऱ्यांना आणि आपल्याला सुद्धा केवळ खोबण्यांचाच आधार असल्याचे आपल्याला जाणवते.




पायऱ्या चढताना पावसाळ्यात त्या किती धोकादायक बनू शकतील याची कल्पनाच करवत नव्हती.नक्कीच पावसाचे पाणी आणि बरेचदा शेवाळ कातळात साचून रहात असले पाहिजे. त्या क्षणाला,केवळ साहसी प्रकार करण्याच्या नादात काहीही करायला जाणाऱ्यांची आणि “आम्ही ट्रेक करतो म्हणजे आम्ही मृत्यूशी झुंज देतो” वगैरे मानसिकतेची काहीशी कीव वाटली. निसर्गाशी हात करण्याच्या ह्या सगळ्या प्रकारामुळे निसर्गाच्या जवळ जाण्याचे भान अगदी राहातच नाही.

इथून पुढे थोडा वळणाचा टप्पा वाकून पार करावा लागतो. एका बाजूला किल्ल्याचे कातळ आणि दुसरीकडे दरी! आणि इथेच आपल्याला दर्शन घडते, गडावरील नेढ्याचे! केवळ अप्रतिम !!







इथून पुढे अजून एक दरवाजा ओलांडून आपण गडावरील तळ्यापाशी येतो. इतर अनेक गडांवरील तळ्यांप्रमाणे हे पाणीही तितकेसे आरोग्यकारक वाटले नाही.



तळ्याशेजारीच हनुमानाचं मंदिर आहे. विशेष उल्लेख म्हणजे इथल्या मारुतीला मिशा आहेत. इथून उजवीकडे गडाच्या बांधकामाचे काही अवशेष दिसू शकतात.







हरिहर हा बरेचदा हर्षगड म्हणूनही ओळखला जातो. त्र्यंबक डोंगररांगेतील आपल्या महत्त्वाच्या स्थानामुळे तसेच महाराष्ट-गुजरात सीमेच्या देखरेखीच्या दृष्टीने महत्त्वाचा असा . हरिहर मुख्यतःप्रसिद्ध आहे आपल्या नागमोडी वळणावळणाच्या पायऱ्यांसाठी. तसा गडाचा विस्तार अगदीच थोडका.




कोणतीही अतिभव्य वास्तू नाही की राजमार्ग नाही. मात्र जे काही आहे ते केवळ अनुभवण्यासारखे ! गडाचे पठार फार मोठे नसले तरी चढ चढण्याचा थकवा निवण्यासाठी पुरेसे. काही भग्नावशेष आणि त्याच्या बाजूलाच पाण्याची काही टाकी

आपणास दिसतात. त्यातील एकच  पिण्यायोग्य. गडाच्या एका टोकाला असणारा चोरदरवाजासुद्धा  बुजलेल्या अवस्थेत आहे.







हरिहरचा विस्तार तसा त्रिकोणी, बराचसा कातीव खडकाचा. सध्याची बाजू सोडता इतर २ कडा सुमारे ९० चा कोन करून उभ्या ठाकलेल्या! निरगुडपाड्याकडे तोंड करून असणाऱ्या कड्याला स्कॉटीश गिर्यारोहकाच्या स्मरणार्थ ‘स्कॉटीश कडा’ असेही म्हणतात.

ऊन आता चांगलेच रणरणत होते आणि अशातच देवव्रतचे ट्रेकवर असताना चमच्याने पाणी पाजण्याचे धोरण अजूनच दमछाक करत होते.अखेरीस  आम्ही  सर्वात  उंचावर असलेला  (सुमारे  १५-२०  फुटांचा)  चढ  चढून  अगदी  शिखरावर  पोहोचलो.




हा बराचसा सोप्पा टप्पा ओलांडून आल्यावर आपल्या आणि आभाळामधील अंतर बरंचसं कमी झाल्यासारखं सर्वांना वाटलं. इथून आपल्याला पश्चिमेस असणारा बसगड,पूर्वेस ब्रह्मगिरी आणि अगदी निरभ्र वातावरणात औंधा-पट्टा,कळसूबाई,सातमाळा इत्यादी गिरिशिखरे साध्या डोळ्यांनी न्याहाळता येतात. वाघेरे, त्रिंगलवाडी,खास करून अप्पर वैतरणा तलाव आपल्या नजरेत भरतो.

गडमाथ्यावर भगवा ध्वज आपले स्वागत करतो. याचसाठी केला होता अट्टाहास !!!





आपण सध्या उभे असलेल्या उंचीच्या निम्म्या उंचीवरून गरुड, घारी उडताना पाहून आम्ही सुखावलो. गडमाथ्यावर जागा निमुळती, पण त्या शांततेत खाली गावातून वाहणाऱ्या ओढ्याचा आवाज मी कानात साठवत बराच वेळ बसून होतो.

**पोटापाण्यासाठी:**

आमच्याजवळ असलेल्या जेवणात प्रमुख्याने आलू पराठा , थेपले, पुरी भाजी,शिरा ह्यांचे वर्चस्व होते . अगदी काही क्षणातच आम्ही त्या सगळ्याची वासलात लावून टाकली. गडावरील तळ्यातील आणि टाक्यांतील पाणी पिण्यालायक असल्याचे गावकऱ्यांचे म्हणणे असले तरी पाहून तसे वाटले मात्र नाही .

**परतीचा प्रवास:**




उतरणीचा टप्पा आम्ही झपाझप पार केला. पुन्हा पायऱ्यांचा सामना करण्याची वेळ आली. माझी बॅग अचानक पुन्हा जड झाल्यासारखे वाटले.उतरताना आता खरंच पाय थरथरत होते. ह्यातून वाचलो तर अजिबात पुढच्या ट्रेकला येणार नाही असं मी अगदी मनाशी पक्कं ठरवलं.  कधी एकमेकांना सावरत,सूचना करत, पायऱ्यांची माहिती देत आम्ही हळूहळू तो टप्पा पार केला. सगळ्यांच्या तोंडावर आनंद ओसंडून वाहत होता. "डर सबको लागता है,बताता कोई नहीं |"




सबंध प्रवासात तरुण साकेक आणि आभाषची लुटुपुटूची भांडणे, तरुण टीसेकचे थकून जाणे आणि निनादचे त्यांना सांभाळून घेणे अखंड चालू होते. मनोज हा तसा आमच्यातील 'निष्पाप ससा' पण नेहमी शॉर्टकट आणि मोबाईलच्या रेंजच्या शोधात. अगदी पायऱ्या चढताउतरतानाही ह्याचे हे प्रकार सुरूच.

परतीच्या प्रवासात जरा एका ठिकाणी झाडांच्या छायेत थांबलो. आता देवव्रतचा पाण्याबाबतचा दानशूरपणा पाण्यासारखाच ऊतू  जात होता. पाण्याबरोबरच चॉकलेट, गोळ्या,बाकरवड्या एकेक करत बाहेर निघाल्या. इतक्यात समोरच्या झाडावर

आमचे लक्ष गेले. त्यावर कोण्या जंगली प्राण्याच्या नखांचे ओरखडे होते. बस्स. म्हणजे


कोणीतरी इथेही आहे म्हणायचे तर...

३. १० वाजता आम्ही पुन्हा पायथ्याच्या गावी पोहोचलो. एव्हाना सगळ्यांनीच बरेचसे क्लिक क्लीकाट करून झाले होते. आमचा मित्र देवव्रत गडावरच्या कचऱ्याबद्दल भलताच जागरूक, पण म्हणून दिसेल तो कचरा (भले तो आम्ही केला नसला तरीही) माझ्या (आधीच जड असलेल्या) बॅगमध्ये टाकणे हा माझ्यावरचा सर्वात मोठा अन्याय होता .

वैतरणा ही ह्या परिसरातील मुख्य नदी पण ह्या ठिकाणचे पाण्याचे दुर्भिक्ष आणि विजेचा तुटवडा पाहता त्यावर चटकन विश्वास ठेवता येत नाही.

संध्याकाळसाठी एकूण दोन बसेसचा चॉइस आमच्याकडे होता. एक कसाऱ्यासाठी आणि दुसरी इगतपुरीसाठी(दोन्हीही ३. ३० च्या सुमारास). नेहमीच्या अनुभवानुसार बस काही आली नाही .



आम्ही घोटी-वैतरणा मार्गे जाणाऱ्या एका जीपचा आधार घेतला. आम्ही कसेबसे गाडीमधून आणि दोन्ही "तरुण " जीप "वरून " निघालो. ड्रायवर पकडून तब्बल २३ जण होतो आम्ही जीपमध्ये (आणि जीपवर). पुढे ३, ५ मधल्या सीटवर, ८ जण पाठीमागे, ३ डाव्या बाजूला लटकलेले आणि ३ पाठीमागे लटकणारे, उरलेले २ कॅरियरवर ! अजून एक वेगळा अनुभव! आणि काय? त्या जीपने आम्हाला खोडाळ्यापर्यंत आणि तिथून अजून एका जीपने आम्हाला कसारा स्टेशन पर्यंत सोडले . तसे पाहता



खोडाळ्याहून कसाऱ्यासाठी एस. टी . चीही सोय आहे.

खोडाळा ते कसारा हे अंतर २५ किमीचं . सुमारे १७ किमी नंतर आपला मातीचा रस्ता जाऊन थेट मुंबई-नाशिक एक्सप्रेस वेला जाऊन मिळतो (पण रॉंग साईडने बरं का!). आम्ही संध्याकाळी ५. ०० वाजता कसारा स्टेशनला पोहोचलो आणि तिथून पुढे साधारण रात्री १०. ०० पर्यंत आपापल्या घरी .

**सहभागी मित्रपरिवार:**

आभाष, मनोज , निनाद, तरुण (टीसेक आणि साकेक, तुमच्या माहितीकरिता सांगायचे तर टीसेक आणि साकेक ही दोन्ही मुंबईतील इंजिनियरिंग कॉलेजची संक्षिप्त रूपं आहेत ), देवव्रत आणि मी .

**ऋणनिर्देश:**

छायाचित्रण - देवव्रत फळ.

नकाशा- trekshitiz.com